**विस्तार व सुधारणा योजनेअंतर्गत वरसगाव धरणाच्या विशेष दुरुस्तीचाप्रस्ताव मोनोलिथ क्र. ७ व मोनोलिथ क्र. ८ मध्ये गळतीप्रतिबंधक उपाययोजनेसाठी प्रशासकीय मान्यता....**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/(४७६ /१४)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई

तारीख: २० /०८/२०१४

**वाचा**

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/३/प्रशा १/ ६२७८ दि.१४.८.२०१४

**प्रस्तावना**

वरसगाव धरण हे पुणे शहराच्या पश्चिमेस ४० कि.मी. अंतरावर असून दगडी बांधकाम आहे. धरणाची लांबी ७८७ मी. व नदीपात्रामध्ये जास्तीत जास्त उंची ६६.८५ मी. व पाण्याच्या स्तंभाची उंची ६०.०७ मी. आहे. दगडी धरणासोबत डाव्या बाजूस ४४९ मी. लांबीचे मातीचे सॅडल डॅम बांधलेले आहे. धरणाची संकल्पीय साठवण क्षमता १३.२५ टीएमसी (३७५.३६ दलघमी) आहे. धरणाचे बांधकाम १९८६-८७ ला पूर्ण झाले व सांडव्यावरील गेट बसविण्याचे काम सन १९९२-९३ ला पूर्ण झाले आहे. सन १९८६ मध्ये प्रथम पाणी साठविले, त्यावेळी धरणातून पाण्याची गळती १२३१ लीटर /सेकंद एवढी होती. पाण्याच्या गळतीचे प्रमाण कमी करण्यासाठी दगडी धरणाच्या भिंतीस पाण्याकडील बाजूस गनायटिंग करण्यात आले आहे. वरसगाव धरणातून होणाऱ्या गळतीबाबत धरण सुरक्षा संघटना, नाशिक यांनी गळती प्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबत सुचविले आहे. तसेच केंद्रिय मृद संशोधन संस्था, नवी दिल्ली यांनी नॉर्वे देशातील एनजीआय या संस्थेमार्फत संयुक्तरित्या सन २००६ ते २००९ या कालावधीमध्ये गळतीबाबत धरणाचा अभ्यास करण्यात आलेला असून धरणास गळती प्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबत सुचविले आहे. धरण सुरक्षा संघटना, नाशिक व केंद्रिय मृद संशोधन संस्था, नवी दिल्ली यांनी सुचविलेल्या गळती प्रतिबंधक उपाययोजना त्वरीत करणे आवश्यक आहे. त्यानुसार धरणाच्या मोनोलिथ क्र. ७ ते ८ मध्ये पाणी गळती थांबविण्यासाठी दगडी बांधकामामध्ये ग्राऊटींग करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. ग्राऊटींगमुळे दगडी बांधकामामधील पोकळी भरुन निघाल्याने बांधकामाची संकल्पीत घनता निर्माण होईल. वरील सर्व बाबीचा विचार करुन सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे विस्तार व सुधारणा योजनेंअंतर्गत योजनेअंतर्गत वरसगाव धरणाच्या मोनोलिथ क्र. ७ व ८ करिता विशेष दुरुस्ती अंतर्गत गळतीप्रतिबंधक उपाययोजनेच्या एकूण रु. ४९५.७८ लक्ष (कामावरील खर्च रु ४५०.७१ लक्ष व रु ४५.०७ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटींच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३)प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Miles Stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास

दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती (१२)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अनुदान (४७०१ जे १६७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा .

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ३४ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२०१७२६५१७४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.20 19:12:25 +05'30'

**कि.ल.संखे**
शासनाचे कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,

१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे  पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे
१३. मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग,  नाशिक
१५.  मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
१६. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता,पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/(४७६ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक २०.८.२०१४ चे प्रपत्र**

**परिशीष्ट**

| अ.क्र | कामाचे नांव | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | दगडी धरणातील मोनोलिथला सिंमेट ग्राऊटीग करणे व केमीकल ग्राऊटीग करणे | **४५०.७१** |
| | **एकूण** | **४५०.७१** |
| | अनुषंगिक खर्च | ४५.०७ |
| | **एकूण** | **४९५.७८** |

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | सी- कामे | ४५०.७१ |
| | **एकूण** | **४५०.७१** |
| | अनुषंगिक खर्च | ४५.०७ |
| | **एकूण** | **४९५.७८** |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.20 19:12:50 +05'30'

**कि.ल.संखे**
शासनाचे कक्ष अधिकारी